*Atmaram Kaniram Rathod Yanchya Kavita* (Marathi)
Atmaram Kaniram Rathod

आत्माराम कनीराम राठोड यांच्या कविता
आत्माराम कनीराम राठोड

मूल्य रु. ६५/-



प्रकाशक
भाषा पब्लिकेशन्स
भाषा संशोधन-प्रकाशन केंद्र
६, युनायटेड ॲव्हेन्यू, दिनेश मिलजवळ
वडोदरा ३९० ००७
फोन : ०२६५ २३३११३०

मुद्रक
शिवम् ऑफसेट, आजवारोड, वडोदरा

# दोन शब्द

'लदेणी' हा माझा पहिला कवितासंग्रह. त्याच्या पन्नासेक प्रती बाहेर आल्यात. उरलेल्या माझ्या मुद्रणालयाला लागलेल्या आगीत भस्मसात झाल्यात. तेंव्हापासून माहितीच्या मित्रांकडून त्याची सतत मागणी होत आलीय. १९९४ साली केवळ लदेणी पुनर्मुद्रित न करता माझ्या समग्र कविता छापण्याची योजना यवतमाळच्या मित्रांनी आखली. पण माझे दारिद्र्य आणि योजनेतील स्वप्नाळूता यामुळे ते शक्य झाले नाही.

१९९५ साली मी ख्रीस्तांगिकार केला. त्यामुळे अनेक मित्र गैरसमजापोटी क्षणिक दुरावले. मात्र मी चळवळीशी नाळ तोडली नाही. हळुहळू जुने मित्र जवळ येऊ लागले. आता बहुतेकांशी पूर्ववत् संबंध जोडले गेले आहेत. ही आनंदाची बाब. या आनंदाला लदेणीची मागणी पुष्कळवेळा ओहोटी देऊन गेली.

१९९७ च्या सुमारास माझी भाषा केंद्राबरोबर ओळख झाली. हळुहळू म्हणता येणार नाही एवढ्या वेगाने संबंध जुळले. माझ्या कथा-कवितांसाठी नवे अभिव्यक्तीपीठच जणू त्यामुळे मला मिळाले. 'अज्ञानकोश' मधील जवळ जवळ सर्व कथा मी भाषा केंद्रात सादर केल्या. त्याच परिवारातील काही मित्रांच्या आग्रहासाठी त्या लिहून काढल्या आणि त्यांच्याच हवाली केल्या. दोन वर्षांपूर्वी त्यांनी अज्ञानकोश छापला. आता त्याच्याही प्रती बाजारात उपलब्ध नाहीत. अज्ञानकोश चा हिन्दी अनुवाद हिन्दी 'बूधन' मधून छापून आला. त्यावरून सुप्रसिद्ध समाजसविका व ज्ञानपीठविजेत्या महाश्वेतादेवी त्याचा बंगाली अनुवाद करीत आहेत. एकदा त्यांनीच लदेणीची मागणी केली. माझ्याकडे केवळ एक झेरॉक्स प्रत तेवढी होती. ती ही मराठी. देता आली नाही. पाठ असलेली 'सापा मुंगुसाची लढाई' ही एकमेव कविता ऐकवली. तीही हिन्दी अनुवाद करून. आणि पुन्हा एकदा कवितासंग्रह काढण्याची उबळ आली. अरुणाबेन जोशी या भाषा केंद्राशी

जोडलेल्या होत्या. त्यांनी कविता संकलित केल्यात. चित्रकार बळी खैरे यांनी या कवितासंगृहाचे मुखपुष्ठ १९९८ साली काढले होते. ते संगृही होतेच. त्यांच्या प्रेमापोटी तेच वापरले आहे. त्यांचे व अरुणा जोशींचे आभार मानावे एवढे आमचे संबंध तकलादू किंवा औपचारिक नाहीयैत.

या संगृहातील शेवटच्या नऊ कविता एका वेगळ्या 'मूड' मध्ये लिहल्या होत्या. त्या अजून लिहावयाच्या होत्यात. मात्र 'एक डाव अर्ध्यावरती' संपला. आणि त्यानंतर जवळजवळ २० वर्षे मी कविता लिहूच शकलो नाहीयै.

सशक्त कवितांना प्रस्तावनेच्या टेकूची गरज नसते. हे माझे स्पष्ट मत. तरी पण 'केवळ आपणच फार कामात असतो' हा माझा गैरसमज दूर व्हावयाचा असावा. म्हणून कोणी रिकामटेकडा प्रस्तावनालेखक मला भेटला नाही. म्हणून प्रस्तावनेच्या तिखटमिठाशिवायचा हा संगृह वाचकांच्या हाती देतोय. केवळ प्रस्तावनेच्या अभावामुळे तो वाचकांना अळणी निश्चितच वाटणार नाही याची खात्री आहेच.

भाषा केंद्राचे अध्वर्यू डॉ. गणेश देवी यांनी आणखी एकदा माझ्या पुस्तकावर भांडवल गुंतवले आहे. याची मात्र काळजी वाटते. कारण पुस्तक हाती पडताच अनेक मित्र एवढे आनंदून जातात की, ते किंमत द्यायची विसरून जातात. हा भारतभरातील कवींचा अनुभव. मीच त्याला अपवाद कसा असणार?

हा संगृह घेणारा ग्राहकवर्ग मला माहित आहे. त्यात माझा बंजारा समाज नसणार. याचे अतीव दुःख होते. म्हणून प्रत्येक वाचकावर ती जबाबदारी सोपवावीशी वाटते. त्यांना भेटणाऱ्या बंजारा तरुणांना त्यांनी या कविता सांगावयाच्या आहेत. समजाऊनही द्यावयाच्या आहेत.

लोक परिषद चे माझे मित्र डॉ. अजय दांडेकर यांनी व पाळक अश्विन वाकोडे यांनी वेळोवेळी दिलेले प्रेम माझा ठेवा आहे. आणि ते वाटता येण्यात धन्यता आहे.

आमेन !

१७-५-२००३ आत्माराम कनीराम राठोड
दीनबंधू, शास्त्री चौक,
वर्धा ४४२००१

## अनुक्रमणिका

## आयुष्याचे पुस्तक

पडतांना
सफरचंद तुटून
पाहतांना
एखाद्याला सुचतो सिद्धांत
गुरुत्वाकर्षणाचा.

हृदयं आमची
पडतात गळून
तुटतात तटतट
तरी
या चिरंतन सीमांना
काहीच कसे वाटत नाही ?

आयुष्याचे पुस्तक
राहिले असते कोरे तर
काहीच वाटले नसते
सखी सोबती
युगोयुगीच्या नाममुद्रा
केवळ उमटूनच का
लोपू पाहतात...???

## कितवी आवृत्ती

हा साडेसातीचा फेरा क्रमाने
कितवा
ज्यात मी
जन्मलो-बर्बादलो-सडतो आहे.

शनीला उलटा टांगून त्याच्या
पाठीवर झोपणारा रावण; मी
शोधतो आहे.
विचारायचे आहे त्याला. तुम्हाला
विचारतो आहे.

भाळी, कपाळी किंवा तळहाताच्या
रेषेवर
धर्मराजाला
विचारायचे सोडून, यक्षांनी
लिहलेल्या प्रश्नांची
माझ्या वाट्याला आली
कितवी आवृत्ती ?

## वाणी

वंचितांना रेडे करून
वेदना मुक्या केल्यात त्यांच्या
हा अपराध होता, जघन्य
म्हणून एका
चिडलेल्या चिमुरड्याने
प्रत्यक्ष रेड्याला बोलते केले, तेव्हा
हादरलेल्यांनी
संजीवन समाधीच्या त्या अधिकाऱ्यास
शेड्यूल कास्ट स्कॉलरशिप
सारख्या
मुक्या करणाऱ्या
शुद्धीकरणाच्या सवलतीच्या अधिकारात
जेरबंद करून
बोलता येऊ लागलेल्या रेड्याला
लिहून दिली सनद
पैसा पासरी शेंदूराची,
आणि
जनावराचे जीवन जगणाऱ्यांना
वाचा देणाऱ्या
माऊलीचे गणगोत होऊन
त्याच्या आत्म्याच्या पाठीवर
भाजून घेतलेत त्यांनी

आपले
वतनी पानगे-रोडगे.
पुन्हा एकदा
आम्हीच खोदलेल्या
गावच्या पाणवठ्यांचे पाणी
काशीयात्रेहून दुर्लभ झाले होते
आम्हाला. तेव्हा
एका पुण्यात्म्याने
एक कावड पोचवली आमच्यापर्यंत
तेव्हा त्या बिचाऱ्याच्या अंगावर
सहस्त्रवेळा थुंकून थुंकून थकल्यानंतर
गाढवांना काशीची कावड पाजणारा
एक महात्मा म्हणून
केल्या गेली त्याची संभावना
आणि त्या एकीकरणाच्या नाथाच्या
समाधीचे झाले अनेक नाथ

दोस्तहो !
उन्मत्तांच्या तलवारीने उध्वस्ततात
मंदिरे
चिपळ्या टाळ आणि वीणा
फुटू शकतात बिचाऱ्या
पण त्यांनी आणलेल्या
कोणत्याही लाटेत
बुडवण्याची बिशाद नसते
एखाद्या
वाण्याच्या वाणीला ! !

## लेखणी

रक्ताने माखलेल्या हातात
लेखणी येताच
हजारो वर्षांपूर्वी
त्याने पाहिले
एक स्वप्न...
-एका वनवास्याला राजा करण्याचे !
त्याने सिंहासनावर बसविले त्याला
तरी पण, त्या दुर्दैवी राजाच्या मुलांना
जन्म घ्यावा लागला
तो, वनवासी आईच्याच पोटी...
पुढे त्या शोकांतिकेचे झाले
अनेक स्वैर भाविक अनुवाद
मात्र, वनवास्यांना राज्य देण्याचे स्वप्न
अजून स्वप्नच राहिलेले आहे...
कारण;
असावी लागते
वाल्याकोळ्याच्या रक्तरंजित हाती लेखणी
वनवास्यांना राज्य देणारी...
रामराज्य लिहिणारी !!




## ...बोली मात्र झूट होती

दोन्ही बाजूंनी ठोकतो आयुष्य ढोल करून.
आवाज निघत नाही.
डोंबाऱ्याचा प्रेक्षणीय खेळ होतो. हल्लेखोरही
ढुंकून बघत नाही.

ज्याने त्याने टाळीच टाकली, आयुष्य
पसरल्या पदरात.
थाळी पळवणाऱ्याने गणना केली,
मनोरंजनाच्या सदरात.

हृदयातले स्वप्न देऊन आम्ही, मरण
विकत मागितले.
नकार देतांना त्या कठोरांनी, शब्द
उपदेशाचे सांगितले.

सगळेच अभाव होते आयुष्यात, तरी
पराभवांची लूट होती.
आमचे लिलावच खरे होते, दोस्तांनो !
त्यांची बोली मात्र झूट होती.






## अशी एकवीस पत्रं

:स.न.वि.वि.
अशी एकवीस पत्रं
आपल्या मित्रांना पाठवावी.
देहापासून दूर
जातीगोतीच्या छिनाल लक्ष्मणरेषेपलिकडे
अडकून पडलेल्या
माझ्या मुक्ततेच्या पहाटपावलांची शपथ,
मला साक्षात सांगून गेले आहे
येथील
दलित वंचित पीडित शोषितांचे
उद्याचे भविष्य
की, बाबारे कोणताही महात्मा
कोणताही चमत्कार
करू शकत नाही तुमची मुक्तता
आणि रोखू शकत नाही
तुमच्यावरील
अनन्वित अत्याचार.

हे खोटे मानून
न ऐकता
लोकशाही माऊलीच्या पदराखाली
विश्वासाने

स्वाभिमानपूर्वक जगू पाहणारी
मूर्ख अज्ञानी सर्वहरा जनता
बेलछी; बिहार;
मराठवाडा बाजितपूरची
चिरडल्या गेली..
दलित प्रतिपालक धर्मनिरपेक्ष
लोकशासनाने धारण केलेल्या
संगिनीच्या सावलीत
बेचिराख झाली.

एकाला तर
स्वप्नच पडले होते
आमच्या मुक्ततेचे
पण तोही चुकला
अशी एकवीस पत्रं लिहायला
त्यामुळे त्याचे स्वप्न
साकारायच्या ऐवजी
घटनेच्या कलमाकलमातून
अक्षरशः चिणल्या गेले
बंदिस्त झाले.

सावधान ! अनादर न करता
या पत्राचा
अशीच पत्रं लिहावीत
आपल्या मित्रांना
एकवीस.
कळावे.

## यादी

युद्धपातळीवर श्रम करून
पहिली मतदारयादी केली तयार
लिपिबद्ध होऊन
माझेही नाव
झाले मुद्रित
तेव्हा कोण आनंद झाला होता !
आईबाप काहीही म्हणवत
जगले असोत;
मी माणसांच्या यादीत आलो होतो.

ती तयार करणाऱ्या
आणि करवून घेणाऱ्या महाभागांना
त्रिवार वंदन करताना
भरून आले होते.
तेव्हा माहीत नव्हते
की, नतमस्तक होण्यासाठी
श्रद्धेने झुकवलेल्या मानेवर
बैलाच्या खांद्यावरील अवजड जू
येणार आहे
आणि
आपण जुंपल्याच जाणार आहोत
परत शोषकांच्या सुखाला

पिढ्यानपिढ्या ओढण्यासाठी.

आणि, आमच्या वेदनांना हुसकावण्यासाठी
जाहीरनाम्याचे डांगोरे पिटीत येणारे
हे मुखवटे बदललेले हाडवैरी पिढ्यांचे
परत करणार आहेत कुरघोडी
आमच्या जिवावर
लोकशाहीच्या नावाने.

दगडांना तारण्याचे सामर्थ्य
असलेले हे राम
केवळ बुडवायलाच
निघाले आहेत आम्हाला.
माहीत नव्हते-
की, टाकीचे घाव सोसल्याने
दगडाला देवपण येणाऱ्या या देशात
ज्यांनी घावच खाल्ले आहेत
पिढ्यान्पिढ्या
त्यांना माणूसपण द्यायला हे
तयार होणार नाहीत.
आणि,
अमृत लाटण्यासाठी प्रसंगी
बांगड्या भरणाऱ्या कावेबाजीचे
हे पुजारी
एक नवे सोंग घेऊन येत आहेत
माहीत नव्हते.

## सेन्सॉर

संस्कृतीच्या
लक्ष्मणरेषेने
माद्रीचे कुंकू गिळले
आणि,
पाराशराच्या स्वर्गसंमत पाशविकतेवर
धुक्याचा पडदा टाकला.
अनेक कर्णांना असेच
अगतिक केलेल्या या देशाने
ऐहिकतेची उंची मापली
आर्यभट्ट उडवून.
पण,
पाय त्याचे आदिअनादी जगातच
घोटाळतात
इंद्रप्रस्थाच्या उत्खननात सापडल्यासारखे
आम्ही
दुःशासनासारख्याच्या उन्मत्तपणाला
दडपण्यापेक्षा-नष्टण्यापेक्षा
नावे ठेवतो फक्त
अजून
द्रौपदीच्या वस्त्रहरणाचे
समग्र चित्रीकरण तेवढे
सेन्सॉर करवून घेतो !

## कोणी काय लिहावे ?

रघू कुलाचे हौतात्म्य
पाहून
पाषाण फोडून प्रगटणारी
ती गंगा
पाणवठ्याच्या पाण्याला वंचित
झालेल्यांच्या
अगणित पिढ्यांच्या बलिदानानेही
डोळ्याशिवाय इतरत्र कोठे
का प्रगटली नाही ?

लोकशाहीतील
आंधळ्या बहुमताचे गुलाम होणाऱ्या
चारही पुरुषार्थांप्रमाणे अगतिक
रुद्र भैरवाची
ती धन्यधन्य गंगा
कावेबाजीला कशी
बांधल्यागेली
अंकित झाली ??

नसलेल्या स्वर्गातून उतरलेल्या
गंगे !
आठवणी पूर्वआठवणींपासून

आता चित्रपटांपर्यंत
उदारतेचे आलेख
तुझ्या पावन रूपाचे अनेक झाले
तरी देखील
तुला तुडुंबविणाऱ्या कावडीतील
एकही कावड
तू तहानेल्याकडे पोचवल्याचा शिलालेख
नाही सापडत

पाण्यावाचून ढळलेल्या
एका पिढीच्या अश्रूं इतकेच
पाणी जरी
परत केले असतेस तू
तरी
गायली असती स्तुती तुझी
बळी गेलेल्या प्रत्येकाने
जगन्नाथ पंडित होऊन

आज
तूच सांग
तुझ्या काठी उभे राहून
बळी गेलेल्या पिढ्यांचा प्रतिनिधी
म्हणून
कोणी
काय लिहावे ?




## माणसातून गेलेल्याची कविता

त्या खेड्यातला एकुलता एक
पदवीधर
आपल्याच घरच्या समारंभात
वावरत होता
उपऱ्यासारखा

मी विचारले
तो तरुण असून
असा का वावरतोय ?

एक जण म्हणाला
साहेब.... करणार काय ?
पदवी आहे त्याला, नोकरी नाही
आणि 'ओव्हर एज' झालाय
आता तर तो
माणसातून गेलाय...






## गारूड्याच्या खेळाची कविता

आयुष्याच्या रस्त्यावरील
दरेक चौकात
गारूड्यांनी मांडलेल्या खेळात
गंडविल्या गेलेल्यांनो !

''जिसका बाप धर्मी, उसका बेटा धर्मी
तुम क्या जानो धर्मी को...''
या भूलथापीला बळी पडू नका.

किती दिवस आणखी
देत राहणार
निढळाची कमाई
यांच्या
तख्त-तराजू-तलवारीच्या सापाला
किंवा
देवदैवाच्या गाभाऱ्यातील
स्मशाने उकरून आणलेल्या
कवटीच्या मांडणीला ?

अरे
आमिषाला बळी पडू नका
सांबांनो
यांनी केलेले

खड्याचे कलदार खरे नसतात
तुमच्या कलदारी आनंदाचे मात्र
हे खडे करून टाकतात.
बोलण्याला फितू नका यांच्या
शेकडो शपथांना
आणि नका घेऊ डोक्यावर
सवलतीसारखे आशिर्वादाचे गंडे ताईत
व्यापार आहे तो त्यांचा
तुमच्या दुःखाचा तो उपाय नाही,

''जेबमे होकर नही देगा
उसके खाब में नागदेव जायेगा
बना काम बिगाड देगा...''
वाघालाही सामोरे जाणारे तुम्ही
स्वप्नात येणाऱ्या सापाला भीत आलात.
शिव्याशापाला बळी गेलात.
असून असून यांच्याजवळ
दात पाडलेले सापच आहेत
तुमच्याच कमाईच्या दुधावर जगून
पोसलेले
टाळीही देत राहू नका
नजरबंदीच्या
या खेळाला पिढ्यानपिढ्या
मस्तवाल दिसतात म्हणून बिचकू नका
माईच्या लालांनो




मोजकेच डाव आहेत यांचे
ओळखून घ्या एकदाचे
आणि
छातीला माती लावून
होऊन जाऊद्या एकदाची
आजवर अधुरी राहिलेली
सापामुंगसाची लढाई !






## खोड चेट्टी

नोटीस घेणार :

साडेतीन हाताच्या मानवी देहातील
घाम व रक्ताचे
तमाम चिल्लर व घाऊक
पिढीजात किंवा नवोदित व्यापारी
व माणुसकीला
वर्णप्रामाण्याची बटीक करून
आपले दोंद फुगवणारे
स्वर्गीय कृपेचे संचालक
आणि लोकशाहीचे अवघे खंदे आधारस्तंभ
ज्यांनी तिला
आपल्या अंगाखाली अंगवस्त्रासारखी
ठेवून घेण्याची कला
केली आहे आत्मसात.

यांना नोटीस देणार :

जगाच्या पाठीवरील ती माणसे
ज्यांचे
आभाळ पेरणी करायला समर्थ असलेले
हात
दर हंगामाला




त्यातल्या श्रेयपायसासह
वर्णपीठाच्या आरतीच्या दिव्याने
भाजले जातात
किंवा तिजोरीच्या दाराच्या फटीत
चेचले जातात
किंवा जाहीरनाम्याच्या
अफूगाफिल आमिषाच्या डंखाने
बधिरविले जातात
ती आम्ही माणसे.

या जाहीर नोटिसीद्वारे कळवितो की :

तुम्ही आमच्या रक्ताघामाला
आपले पारंपारिक अंकित
करून घ्यावयाला
उलटून गेल्या आहेत पिढ्या
जगाच्या पाठीवर
आणि देहाची अशाश्वतता आश्वासणाऱ्या
तुमच्या वर्णसत्यवादी
कल्पित कावेबाजीने
आमच्या देहाच्याच शोषणावर
आपली दोंद फुगवली
गाभाऱ्याच्या गारेगार सावलीतून
जातिरिवाजानुसार...
यालाही
युगे उलटून गेलीत.






एवढेच नव्हे
तर गर्भार राहू पाहणाऱ्या
आमच्या असंतोषाला
समतेची भूल देऊन
कधी कायद्याच्या मसलतीने
घडवून आणले आहेत तुम्ही
रखेलीगत अगतिक झालेल्या
लोकशाहीच्या साक्षीने
कित्येक वेळा
क्रांतीचे गर्भपात.

म्हणून पाप्यांनो !
जे कधीच नव्हते तुमच्याकडे
पण तुम्ही लाटलेले
अंकित वंचिताचे केवळ दिखाऊ पोशिंदेपण;
नसलेल्या स्वर्गीय कृपेचे
नाटकी मालकीहक्क,
आणि
क्रांतीचे बादरायणी जनकत्व
आम्ही झुगारून देत आहोत आता !

कारण,
आम्ही गुण्यागोविंदाने नांदायला तयार होतो
तुमच्या सोबत. तरी देखील
तुम्ही नाकारला आमचा स्वाभिमान
तुडवली आमची अब्रू




चिणल्या आमच्या प्रेमकथा
आणि भुकेकंगाल केली आमची संस्कृती
आमचे चिरंतन अल्पसंतोषीपण..म्हणून..

ज्याअर्थी या नोटिसीद्वारे
जगाच्या पाठीवरील तमाम वंचित, शोषित
मानवजात
तुम्हास देत आहे सोडचिठ्ठी !
त्याअर्थी, ही नोटीस मिळाल्यानंतर
आपले गाशेतोबारे
आता घ्यावे तुम्ही गुंडाळून
कारण तुम्हीच गमावले आहेत
हक्क
माणुसकीने
जगू देण्याचे व जगण्याचे.

(माणसाच्या रक्ताच्या
सही व शिक्क्यानिशी,
माणसाच्या कोर्टातून)









## कोणी सांगावे ?

आम्ही मागतो एक झोपडी,
जी कोणी माईचा लाल जाळणार नाही-पाडणार नाही.
आम्हाला हवेत कपडे अंगाला बाया-बापुड्यांच्या,
जे कोणी उन्मत्त नराधम फेडणार नाही.
कामही हवे आम्हाला स्वाभिमानाचे पोटाला घास,
असे की, कोणत्याच कावेबाजीला ओरबाडता येणार नाही.
एवढेही देऊ शकणार नसाल तुम्ही, तर-
कोणी सांगावे की, तुमची लोकशाही बुडणार नाही ?






## आम्ही

आम्ही
लोकशाहीचे सुभेदार
किंवा त्यांचे पाईक
किंवा जनतेचे सेवक,
आमची मिळकत कशी वाढते
म्हणून काय विचारता, बावळटासारखे !
आकाशाला दिलीय्त कधी
'शो कॉज' नोटीस ?
त्यात पाणी कोठून येते ?

तुम्ही
अस्थिर, चंचल तसेच मरगळलेले
तरी पण वादळ म्हणवून घेण्यात
भूषण मानणारे
तुम्हाला धूळच उडवता येते
चिखल नव्हे.
आणि वादळाने उडवलेल्या
धुळीचे डाग
आभाळाला पडत नसतात !

## दरसाल दरवर्ष

दरसाल दरवर्ष
किती गॅलन रक्त
आकारल्या गेलंय
सूर्य गहाण असल्यापोटी ?
काहीही करून एवढेच
स्वतःला विचारू शकत नाही.

तीनच काय कितीही ठेवले
डोळे तरी
आमच्या गळी विष उतरवून
डोक्याला
अर्धचंद्र दिल्या गेलाय
हे विसरवत नाही...
विसरवत नाही.

## यापुढची घटना

चक्रव्यूहात शिरलेले
आमचे अवघे दिवस
अवसेने बेडीबंद केलेल्या
आमच्या अवघ्या रात्री
अजून संपायच्या आहेत.
यापुढची घटना आम्हीही लिहू
आमची भाषाच अजून
लिपीबद्ध व्हायची आहे !...

सीतेसारख्या पळविल्या गेलेल्या
तळहातावरील आमच्या भाग्यरेषा
अग्निपरीक्षेतून
अजून उमटायच्या आहेत.
रावणाची दिशा दाखवणारे
घायाळ जटायू
अजून भेटायचे आहेत.

बोलता न येणाऱ्या वेदना
लादल्या गेलेली एकतर्फी युद्धबंदी
असे आमचे अदृष्ट लिहिणारे विधाते
समोर आहेत जयद्रथासारखे
सरणा भोवतीच्या प्रदक्षिणा

संपल्या आहेत
केंव्हाच !
केवळ सुदर्शनाआड लपलेला सूर्य
अजून दिसायचा आहे.

एअर-कण्डीशन मधील
गोऱ्या देहाच्या काळोखाने चालविलेला
पाठलाग
चालू आहे.
झोपलेला मुचकुंद
अजून जागायचा आहे.

पिढ्यांच्या वाढीने वाढत गेलेली
तमाम दुःखे
आम्ही परंपरेने
आमच्याच पिढ्यांना वाढत आलो
कुजलेल्या स्मृती
आणि त्यांचे शाप
अजून नष्टायचे आहेत
या डबक्यात कैद असलेली पुनव
मुक्त क्षितिजी
अजून उगवायची आहे...
अजून उगवायची आहे...
या पुढची घटना आम्हीही लिहू !
आमची भाषा अजून
लिपीबद्ध व्हायची आहे !

## जात

जाहीर करतांना
मायबापांनी लादून
आणलेली जात,
लिहून देतांना मागासपण
चीड येते
पण खरंच सांगतो
वस्तुस्थिती आड येते

दीड रूपया प्रमाणे
साता दिसाची मजुरी
किती होते ?
शेजारची म्हातारी आमची
कधी साडेनऊ तर
कधी साडेसात आणते
आणि,
गोप्याच्या आजोबाने काढलेल्या
तीन वीस रुपयांचे व्याज म्हणतो
दरवर्षी शंभर रुपये होतात.

मला हे असे गणित
अजून कळत नाही.
जळतं मन
पण स्वतःला मागास
लिहताना हात लाजत नाही.




## उगवणाऱ्या उद्यापर्यंत

ज्याचा केला गेला असेल पाठलाग
तरण्या गोऱ्ह्यासारखा
ठेचून बैल करण्यासाठी...

त्यांच्यातल्या ज्यांच्या लक्षात असेल
की, कडेलोट माणसांचा करता येतो
छाव्यांचा यशस्वी होतोच असे नाही !
त्यांच्याकरिता
मनातले करण्यासाठी
पुकारल्या जातेय जाहीर झुंज !...

या ! !
पण प्राणच नोंदून घेतले जाणार आहेत
दोस्त
नोंद फी नसलेल्या या सामन्यासाठी
तरीही जीवित्वाची जबाबदारी
ज्याची त्याच्यावर राहील-
उगवणाऱ्या उद्यापर्यन्त ! ! !






## दिवाळी

झालीच नसती अक्षर ओळख
तर केली असती दिवाळी
अडाणी होते पूर्वज
गावदेवीपेक्षा
द्रोण-प्रतिमा केल्या असत्या त्यांनी
तर द्रोणाचार्यांनी नेले असते त्यांचेही
अंगठे !
मग ठसे द्यायला काहीच राहिलं नसतं
त्यांच्या जवळ
गेलं नसतं त्यांचं सुख !
खरंच,
तो भाग्यवान होता एकलव्य
त्याचा फक्त अंगठा गेला !
पण
... त्याची शेती; त्याची
गुरंढोरं, भांडीकुंडी
राहिली असतील त्याचीच !
... भूतकाळातल्या त्या ठशांची
करता येईल होळी,
पण भोगून गेलेल्या दैन्याची ?
अजून भाजणाऱ्या आगीची ?
... खरंच अजून जडायची आहे




ज्वालांच्या जिभांना
शब्दांची सवय
मग होईल आमची दिवाळी.....






## भीती

दुष्काळाला
भीत नाही आम्ही,
आभाळाच्या कुऱ्हाडीला,
नको येऊ दे पाऊस
आम्ही खोदून
भरून टाकू
समुद्र
कितीतरी
घामाने !

भीती वाटते
ते पिऊन
टाकणाऱ्या
शोषत आलेल्या
अगस्तींची
...त्यांना तेवढे
नामशेष करा !!!

## भेदून जायचे आहे

मातीचा गौरव
भूमीची स्तोत्रे
खूप झाली
आता माणसाविषयी
लिहिणे आहे.

जय-इतिहास-बखरी
एका वळणाची अक्षरे
दृष्टीपाठ होऊन गेलीत
इतिहासावर कधीतरी
नांगराची फाळ
नागमोडी वळण
कोरणार आहे.

ऋतुचक्रात सापडलेल्या
सूर्याचे तपमान
नोंदलेच जाते दररोज
भुकेच्या आगीचे मला
कमाल तपमान
नोंदून जायचे आहे...
भेदून जायचे आहे!!




## उगवू नये

म्हातारीसारखा
मीही लपवावा कोंबडा
पगाराच्या दुसऱ्या दिवशी
आणि, सूर्याने उगवू नये.....






# कुरुक्षेत्र

जोडपी अनेक
मैथुनरत
घायाळ होतांना
पाहिल्यात आम्ही
ठार होतांना
वृत्तांचा पाठलाग करायची
नव्हती जरूरत
लिहण्यासाठी रामायण आमचे
अडचण आहे एकच
अजून आमचा राम
वनवास भोगून परतायचा आहे.

प्रश्न असता
एकएकट्या पांचालीच्या विटंबनेचा
तर आम्ही सूड उगवून गेलो असतो
पण,
असंख्य द्रौपदींच्या अब्रूबद्दल
शासन करावयास धजावलो तर
इंचन इंच भूमी
या देशाची
कुरुक्षेत्र होईल.

## आम्ही राहतो

आम्ही राहतो
भुयार न खोदलेल्या
लाक्षागृहात
कृपा करावी विदुराने
एकच
आगाऊ सूचना
अपघाताची
कळवू नये.

## राज्य

माणुसकीला गहाण ठेवणारी
चिरंतन बीजं
छत्तीस कोटी लोकांनी
शपथपूर्वक दडपली
आणि पहिल्याच पानावर
लिहली प्रतिज्ञा...
... भारत माझा देश आहे. सारे
भारतीय माझे बांधव आहेत.
....
शू ऽऽऽ मुलांनो
निबंधाच्या या तासात
लिहून घ्या
''१५ ऑगस्ट,
१९४७ साली या देशात
रामराज्य येऊ घातले...''
गुरुजी शिकवायचे.
गुरुजी शिकवायचे. गुरुजींनी
शिकवलेल्या नकाशात
आज शोधून सापडतात
केवळ राज्यं.
त्यातील रामाला पळविणारे
अहिरावण महिरावण कोण ?

## निखाऱ्यांना कोळसे करणाऱ्यांनो

निखाऱ्यांना कोळसे करणाऱ्यांनो
जरा जपून
तुमचे हात पोळणार नसतील तरी
काळे होणार आहेत-
ते तोंडाला लागू देऊ नका
चालेल तोपर्यंत खुशाल करा
हा धंदा..
भस्मासुराची बेभानता स्वतःहून संपते.
धंदेवाईक प्रेषितांनो
अमाप आश्वासने देत बसू नका
केवळ देता येतात म्हणून !
आम्हालाही कळते...
प्राणवायू झाला तरी काय ?
नसलेले प्राण त्यालाही देता येत नाहीत
अरे !
त्याला स्वतःलासुद्धा प्राण नसतो !




## हात

आजकालचा
छत्र म्हणून डोक्यावर घ्यायचा
प्रत्येक हात
भस्मासुराचा...






## सांभाळता येणार नाही

अहिल्येचा उद्धार केला म्हणून
सीता भूमिगत करण्याची शिक्षा
माझा राम भोगणार नाही.

ऐश्वर्याबरोबर डाव
द्रौपदीचा खेळेल
एवढी पत
धर्माची मला ठेवता येणार नाही.

हरिश्चंद्र झाला राजा तरी
दान स्वप्नात द्यावा
माझा देश
एवढे अधिकार आता
देता येणार नाहीत.

पटापट मरत असता
आमची चिल्लंपिल्लं
निर्वासित पोसण्याचं पुण्य
फाटक्या झोळीत आमच्या
आम्हाला सांभाळता येणार नाही.




## मृत्यू देखील

कवटाळावे असे वाटणाऱ्या या जगात
अस्पृश्य म्हणून जगतो आम्ही
आम्हाला-
मृत्यू देखील स्पर्शत नाही...






## कोठे बुडवीत आहात ?

दोनच काय
कितीही मिळाली स्वातंत्र्यं तरी
हा प्रश्न कायमच आहे-
''ते कोणत्या गाढवीचं नाव आहे ?''

यदुकुलभूषणाच्या थोरवीने
यादवीला घातले खतपाणी
आणि,
गोळ्या खाऊन मिळालेल्या
चिरंजीव महात्मेपणाने
आपल्या
चेलेचपाट्यांना केले बहाल
भस्मासुरी अभय.

असेल अटळ
इतिहासाची पुनरावृत्ती
तर, होऊ द्या
पण एकच सांगून ठेवा
कोठे बुडवीत आहात
सोन्याचांदीचा माझा देश
सुवर्णद्वारकेसारखा ?




## सीतेच्या वतीने

उद्याच्या युगाच्या वाल्मिकींनो !
लेखणीच हातात घेऊन
बसू नका.

वाल्या कोळ्याच्या हातातील कुऱ्हाडही
असू द्या जवळ.

पोचलीच नाही तुमची कथा
कुश-लवाच्या जन्मापर्यंत तर
अडवता आला पाहिजे
तुम्हालाही
अश्वमेधाचा वारू
वनवासी होणाऱ्या
प्रत्येक सीतेच्या वतीने...









## सोन्याचे झाले मुंगूस

सोन्याचे झाले मुंगूस
घटकाभर राखेत लोळल्याने
मात्र
जीवाचे सोने आमचे
झालेच नाही कधी,
ती काढता काढता
पिढ्यांची
राखरांगोळीच होत गेली.









## आंबट द्राक्षं

बरे झाले असते
मिळाली असती अक्कल
कोणा एका कोल्ह्याची
विकत
तर
आम्हीही या जगाला
आंबट म्हणून
निघून गेलो असतो.









## या जन्मी

स्वप्नांनो !
कोठे रे ठेवू तुम्हाला ?
आता
कितीही ताणले डोळे तरी
मावणार नाहीत त्यात
मला व्याकूळ करणाऱ्या
भुकेच्या प्रश्नांचीच उत्तरं
या जन्मी...









## तसेच राहतात

काळ्याभोर जमिनीत
टाकाव्यात बिया
उगवत नाहीत.
पाय मात्र आमचे
खडकातही
रुजतच जातात...

नशिबाचा आमच्या
विचार करतो
कांही कळत नाही
लिहिणारा बसतो लिहायला
तेव्हा
जवळ त्याच्या बेड्याच असतात.

गिळला गेलेला पाय
गजेंद्राचा सुटतो, मोक्ष मिळतो
परिस्थितीने जखडलेले आमचे पाय
तसेच राहतात...
तसेच राहतात...






## जळतो आहे

किती वेळा करावा विचार
आत्मघाताचा ?
नाकारू पाहावे किती वेळा
अवघे भोग वनवासाचे
जे अजून भोगतो आहे.

जगण्यासाठी
लिहता आले असते पुष्कळ
पण दोस्त !
पुसून सगळ्या नसलेल्या भाग्यरेषा
या हातांनी
आता लिहिण्यासाठी
जगतो आहे...
जळतो आहे.

## चिरफाड

भाग्यावरच पडावी का
पुन्हापुन्हा वीज ?
का करपून जावे त्याने
पिढ्यानपिढ्या..
का केल्या गेले बहाल
हे करंटेपण
आम्हाला..
नपुंसक बीजाचे हे वांझोटे दैव
कधीही न फळणारे
कोणत्या आणीबाणीत
कोणत्या भ्रष्टाचारी हाताने
लादले आमच्यावर ?
सगळ्यांच्या वाट्याला
यावयास हवे
असे अमृत
लाटण्यासाठी
किती वेळा धारण केलीत कोणी कोणी
मोहिनीरूपे
किती कुंड केलेत लंपास
निढळाचे ?

नसली संजीवनी मिळविण्यासाठी
आशेने आलेली

किती पाडसं
ताटकळवलीत तुम्ही टळटळीत काळी
आणि, किती पिऊन टाकलीत
कोळून कचागत ?

राजश्रींना
व्हावेत पुत्र म्हणून
रानीवनी पाणी शोधणारे
किती श्रावण
दिल्या गेले बळी ?
आणि, स्वतःच्याच सौंदर्याच्या शापाने
शिळा होऊन पडल्यात
जित्याजागत्या कितीक अहिल्या
नजरेत तुमच्या ?

कोणत्या पिसाळाने पुरवली बातमी
अंगठ्यावर एकलव्याने
ललाट लिहून घेतल्याची ?
आणि,
पिढ्यानपिढ्या
वनवासी करणारे आम्हाला
प्रॉमिसरी नोटेच्या द्यूतपटावरील
आमच्या ठशांचे फासे
निर्माण केले
कोणत्या शकुनीने ?

आपले मूळ षंढत्व दडपण्यासाठी
खाली माना घालीत

वयोवृद्धांनी
किती द्रौपदींची विटंबना
केली डोळ्याआड
आणि, सिंहासनाचा तोल
सांभाळू शकेल अशा
किती विदुरांना
ठेवल्या गेले कण्यांवर
दासीपुत्र म्हणून ?

आणि, द्वारकेश्वराच्या वाट्याला
चार दिवस कण्या खाल्ल्याने
चालून आलेले थोरपण
ज्यांच्या पात्री पडल्या आहेत
कण्या शाप होऊन
जन्मभर
त्यांच्याकडे मागून तरी
का येऊ नये ?

पूर्वजांच्या बडबडगीतातील पुराणांची
नाही ही चिरफाड
वेदांची
वेदनांची आहे-आमच्या जखमांची...
नसलेल्या दैवाचे नाव
देवाचे
शिखंडीसारखे पुढे करून
आखलेल्या गावकुसाची
ही चिरफाड !...

## जग सत्य आहे !

मायेला मिथ्या म्हणता म्हणता
माणुसकीला पारखे झालेले
तुमचे जग
मिथ्या असेल
पण दोरीला साप म्हणून
ब्रह्मसत्याची शब्दलळिते प्रसवणारी प्रज्ञा
जेथे पोचू शकली नाही
अजून,
ते माझे जग-
सत्य आहे !

शोषितांचे घास गिळून
तुडुंबल्या पोटाने
स्वर्गस्थ कृपेची कल्पना करणे
आणि,
कल्पितांचे भांडवल करून
भाबड्यांना नागवणे
ज्याला जमले नाही कधीच
ते माझे जग-
-पोटच्या पिलांना पोसण्यासाठी
एकेक घास वेचणारी येथील
माया

सत्य आहे !
-ते घास मिळविण्यासाठी
सांडल्या जाणारे रक्त
सोसाव्या लागणाऱ्या कळा
आणि,
नश्वरतेच्या काविळीचे
नपुंसक सोंग पेरणाऱ्या
नजरेतील
उन्मत्त विकाराला
बळी पडणारे
माऊलींचे; तसेच-
कल्पितांच्या कावेबाजीने निर्मिलेल्या
मापदंडाखाली चिरडून
राबता राबता झिजून जाणारे बापुड्यांचे
देह
सत्य आहेत !

मातीतून उठून निसर्गाशी दोन हात करीत
समृद्धी पिकवणारे
पण
आपल्या निर्मितीचा व्यापार
अजून मांडता न आल्यामुळे
दरसाल दरवर्षी
कंगाल होणारे
माझे
जग सत्य आहे !!!...




## येईल तेव्हा येईल

येईल तेव्हा येईल
तो समाजवाद
अनेकांनी
अनेकवेळा आश्वासिलेला
अजून तर
आमच्यापर्यंत यायची आहे
बैलांनाही मिळणारी विश्रांती
वर्षातून एक दिवसाची
पोळ्याची.






## सुखं खोटी स्वप्नं खोटी

स्मृती चघळणे
जखमा गोंजारणे
जखमेवर आपल्या
आपणच मीठ चोळणे
असेच कांहीसे आमचे जगणे

खोल खोल खोदावे
काळीज जाळावे
आपणच आपल्या
प्रेतयात्रेत जावे
क्षण क्षण मरत असेच जगावे

असतात आमच्यापाठी
स्मृतिची काटेरी काठी
सतत टोचतात वेदनाच पोटी
दुःखंच आहेत सत्य
... सुखं खोटी.
... स्वप्नं खोटी.

## विचारून ठेवा

(महाराष्ट- शासनाने भिकारी निर्मूलनाचा कायदा केला. मुंबईतील भिकाऱ्यांना जायकवाडी प्रकल्पावर पाठवण्यात आले पण-)

पळून गेलेत
काम सोडून भिकारी
कडा पोलिसांचा तोडून, जे
त्यांनी उपकार केले
लोकशाहीवर आमच्या

सगळ्याच भिकाऱ्यांना
बेडीबंद करण्याचा केला कायदा
तर, दान घेणारे देवालयात
कार्यालयात घेणारे दक्षिणा
संत्र्यापासून मंत्र्यापर्यंत
सुटतील कसे ?

कोणतं गाव... कोणतं घर
तुरुंग होणार नाही ?
करणार काय
मंत्रालय
मध्यवर्ती कारागृह ?




टेबलावरील
बेडका इतका आधीन तुमच्या
नसेल कायदा डिसेक्शनसाठी

एवढा खुलासा विचारून ठेवा
ॲटर्नी जनरलला
चालतील काय तेव्हा जेलर म्हणून
गावकुसाबाहेरील कोणी ?






## सूर्य ते जिंकणार आहेत

रंजल्यागांजल्यांना
जवळ करणाऱ्या मायेची पेढी
एकाने काढू केली
देहूच्या बाजारात
तीही तालाबंद झाली
उघडायच्या आत
आणि, तिच्या उंबरठ्यावर मग
मिळू लागले
चंद्राचे स्मित-गुलाबाचे गाल
कमलदलांचे ओठ- मृगांचे डोळे
आणखी काही, काही-काही
माया देहूची मात्र
शोधून सापडेनाशी झाली.

पाणी उठले आहे पेटून
रंजल्या गांजल्या वंचितांच्या
वेदना
आपल्याच आपण
बोलू लागल्या आहेत
आता-
कोसळणाऱ्या विजा




डुबणारी जहाजं
तोल जाणारी आपलीच पावलं
सारं काही
तोलू पेलू लागली आहेत.
आपल्या हक्काची
हक्काकडे जाणारी वाट
चालू लागली आहेत-
चंद्र कुणीही जिंकलेला असो
सूर्य ते जिंकणार आहेत,
जिंकणारच आहेत !!






## मला तसे करता येणार नाही !

भाकरीच्या गुलाम बेकारांनी
चाकरी शोधावी
स्वत्व विसरून
ज्यांचे त्याशिवाय भागणार नाही.

पळीभर पगार मिळवण्यासाठी
पसाभर लाचारी घेवून
हिंडावे जॅक शोधत
नाही तर जगता येणार नाही.

मुलाखतीच्या प्रश्नांपेक्षा
ती घेणाऱ्याची करून घ्यावी
तोंडओळख
नाही तर कॉल येणार नाही.

दोस्तहो
घ्यायचे असेल तोंड शिवून
भाकरीच्या तुकड्यांनी
तर खुशाल घ्या !
... मला तसे करता येणार नाही !

## सूर्य

ठेवतात लोक नावं
म्हणतात रिकामटेकडा
बसतो मारुतीच्या पारावर
मी-
तेव्हा-

कुणालाच कसे कळत नाही ?
मी शोधतो आहे अजून
पावलोपावली पेरलेल्या या अंधारात
त्या
मारुतीने उठून
क्षितिज ओलांडून
गिळलेला
सूर्य...

## तुमचा वसंत - आमचा उन्हाळा

कबूल. वसंतात फुलतात झाडंझुडुपं,
कबूल. वसंतात फुटतो कोकिळेला कंठ,
कबूल. सुंदर सुगंधित असेलही वसंत.
पण, तसा वसंत
तुमचा
आनंदाचा-आल्हादाचा.
आमच्यासाठी फक्त
उन्हाळाच उन्हाळा
रखरखता होलपटणारा

या वसंताचा महिमा गावा
मी देखील, असे त्यात काय आहे ?
काय केलंय - काय दिलंय याने आम्हाला ?
करता येत होते उत्तेजित कुणालाही
तेव्हा याने एका गोसाव्यातल्या
स्मशानाला जागविले.
आणि कुणा एका भिल्लिणीला देहशेष करून
तिच्या सवतीच्या नावाला अवताराची महत्ती जोडली.
अशी पापं लपवून पोथी रचण्याचे पुण्य
हवंय कुण्या लेकाला ! ..
म्हणून मी रचावे वसंतायन नव्याने ?

माणूस मेला म्हणजे, मरतोच ठाम.
पण त्याने नरकात जावे की स्वर्गात ?
या पाळीव दुःखाच्या परंपरेप्रमाणेच
वसंत फुलण्याचा तुमचा आनंदही
पाळीवच !
कुणालाच माहीत नाहीये तुम्हाला
की, फुलण्यासाठी वसंत
झाडाची पानंच जात नाहीत नुसती
सावलीही हरवलेली असते.
आणि, तुमच्या बाळंतकाढ्याला लागणाऱ्या
डिंकापासून
सरणाच्या लाकडापर्यंतचे सर्व काही
जमवण्यासाठी
रानोमाळ भटकणारी सर्वहारा माणसं
सावलीमहाग होतात
ती या वसंतातच...

कूलरच्या गारव्यात
'कुहू ऽ कुहू ऽऽ बोलेरे कोयलिया' ची
एल्पी ऐकतांना
जाणवेल कशी
फुटाण्याप्रमाणे फुटत चाललेल्या
नांगरटीच्या ढेकळात होणारी
अनवाणी पावलांची काहिली.
निर्वासितांच्या छावणीत

भीक मागणाऱ्या भिकाऱ्यागत
अजून ती भिरभिरतेय काहीच न मिळवता.
कोकिळेच्या कंठाने रोमांचणाऱ्यांनो
काहिली झालेली ही पावलं पेटून
तुमच्या मऊ जाजमाकडे वळण्यापूर्वी
तुम्हाला
त्यांना शरण यायचंय...
तुम्हाला-त्यांना शरण यायचंय.




## आम्ही वादळाशी वैर घेता...

आम्ही वादळाशी वैर घेता, त्यांनी
किनाऱ्याशी करार केले.
दीपस्तंभांना दिले आव्हान आम्ही, दिशांना
त्यांनी फरार केले.

ज्यांनी भरली भांग त्यांची, त्या
ओठांची साक्ष खोटी ठरली.
सावलीला शरण गेलेत ते, आम्ही
निखाऱ्यावरची वाट धरली.

सुख पांघरून लपवता येते सत्य, एवढेच
आम्हाला पटले नाही
त्यांनाही चुकली वाट दाखवणारे
चंद्र-सूर्य भेटले नाही.






## ही दिवाळी

ही दिवाळी
आमच्या असंख्य,
शोषकांना ;
पिढ्यांच्या पिढीजाद दावेदारांना,
शोषितांच्या शिरी संचिती समाधान
थोपणाऱ्या थापेबाजांना,
दारिद्र्याच्या दारी नवसाच्या नवरात्री
झोडणाऱ्या
बडव्यांना-बुडव्यांना-भडव्यांना;
हक्काचे हंगाम हडपणाऱ्या हरामखोरांना
चातुर्वर्ण्याच्या चबुतऱ्यावर पोट भरणाऱ्या
चिरंजीव चोरांना;
जन्माला जात जोडू शकणाऱ्या
घरघोर जेत्यांना;
माणुसकीच्या मुडद्यावर मौनमहान श्रद्धांजली
वाहत बसलेल्या सिंहासनथोर नेत्यांना,
सत्याशी शत्रुत्व असलेल्या
सत्ता-संपत्ती-संख्येच्या स्तुतीपाठक
कवींना..
लेखकांना..
जाहिरातदारांना




सुख
समृद्धी
भरभराटीची
जाईल...






## किती दिवस ?

किती दिवस
आणखी
म्हणाल दलित...
कुठवर वाचत
जाणार
तोच तो अध्याय.
कीव
करणार किती ?
कुठवर शिकायचा
शिकारी कुत्र्यांचा अभ्यासक्रम ?...

प्रेषितांनो
हे नाही आमचे औषध...
ते असेल भांडवल
तुमच्या नेतृत्वाचे
हतकर्तृत्व वैभवाची तुमच्या
असेल ढाल ती
पण, कधीच जीर्ण झाली आहे
फार तग धरणार नाही.

शिकारीची
सवय जडायला




छाव्यांना
घ्यावे लागत नाहीत
स्वतःचे चावे !
वाट असते
फक्त
डोळे उघडायची... आणि,
तेरा दिवसांनी ते उघडत असतात.






# तो

## प्रवास

दैवाच्या लिपीचे आकलन व वाचन
तो करू शकत होता
म्हणूनच त्याचे लेखनही त्याला
जमणार होते.

आपल्या प्रवासाचे निरंतर मार्ग
त्याला माहीत होते.
म्हणून तो स्वतःला हवे तेथे थांबू
शकत होता
व हवे तेथे वेगाने धावूही शकत होता
कारण, मार्गाचे ज्ञान व दिशेची
ओळख असलेल्यांना
वाट चुकण्याची भीती नसते.

अंधार आणि प्रकाशाची अभ्यस्त
अशी त्याची नजर होती.
प्रकाशाने त्याचे डोळे दिपत नव्हते;
आणि दिशालोप अंधारात चाचपडत
नव्हते.

म्हणून वाटेने चालतांना

विझून जाणाऱ्या दिव्याची त्याला
मदत लागत नव्हती
आपल्याच नजरेने तो
आपल्या वाटेकडे पाहू शकत होता
आणि,
चिरंतनाच्या वाटेवर वाटाडे
उपयोगाचे नाहीत
याचे त्याला भान होते !

एकटेपणाचा कंटाळा येण्याचे त्याला
कारण नव्हते.
या वाटेने आपण असंख्य वेळा
आलो - गेलो आहे
याची त्याला आठवण होती.
आणि माहेरी किंवा जिवलगाकडे जाणारी
वाट, खडतर असली तरी
कधीच कंटाळवाणी वाटत नसते !
पण म्हणून तो अधिरलाही नव्हता
कारण ठरलेल्याच वेळी आपणास
पोचायचे आहे
याचे त्याला अवधान होते !

प्रवासातील पुरेशा शिदोरीबरोबर
त्याने आपल्या दुःखाचेही गाठोडे बांधले
होते.
ते तो कोणत्याही सुखाच्या मोबदल्यात




आणि कोणत्याही यातनेच्या भीतीने
देखील
कोणास द्यायला तयार नव्हता.
कारण वाटेतील दुःखे इतरांना देऊन
टाकणाऱ्यांना सुखाच्या मुक्कामी
पोचता येत नाही..
दुःखाने भरलेले आपले शीड नौकेने
दुसऱ्याला देऊन टाकल्यास
तिचा किनारा हरवतो..
हे तो जाणत होता.

आपल्या उणीवांसह आणि पूर्णत्वासह
सुख आणि दुःखासह
पूर्वकथित ज्ञानासह आणि स्वतःच्या
मनासह
तो प्रवासास निघाला होता!

●

## अश्रू

निघण्यापूर्वी
तो
आपली हृदयस्थ देवता असलेल्या
आपल्या प्रेरणेकडे गेला.
तेव्हा त्याला दिसले की,
स्वागताच्या नित्यनूतन स्मितांबरोबरच
आज तिच्या डोळ्यात






अश्रूही काहुरले आहेत.

तेव्हा तो म्हणाला

तुला आणि तुझ्या दुःखाशी नाते
असलेल्या
सर्वांना
माझ्या जाण्यामुळे
पोरके होणार म्हणून दुःख होण्यापेक्षा
माझ्यावर छत्र धरणाऱ्याकडे मी जात आहे
म्हणून आनंद होऊ द्या!
ही माझ्यासाठी गळणारी तुमची आसवे
माझे हृदय तुमच्यात रुजवो !

आजपर्यंत तुम्ही माझ्यात रुजवलेली
हृदये
विसाव्यासाठी वापरलीत
आता झुंज देण्यासाठी त्यांचा
उपयोग होवो.
आणि या आसवांना
दीन होऊन हात पसरण्यापेक्षा
समृद्धीच्या गडकोटाचे हत्तीदरवाजे
तोडून टाकण्याचे बळ येवो.

जेव्हा तुम्ही समृद्धीचे दार फोडाल
तेव्हा ती साठवणाऱ्या गडकोटांच्या
भिंतीही उध्वस्त करून टाका.

कारण; त्याशिवाय तिला
वाऱ्याबरोबर मुक्त फिरता येणार नाही.
आणि धुळीच्या कणाकणात
खेळता येणार नाही.

कितीतरी वेळा उध्वस्त केल्या गेलेल्या
या भिंती
फिनिक्स पक्षाप्रमाणे पुन्हा जन्मून
उभ्या राहत आल्या आहेत.
म्हणून यावेळी तुम्ही
मुक्त केलेली समृद्धी
परत कैद होण्यापूर्वी
इतस्ततः विखरून द्या !

आणि कोणत्याही कुंपणाशिवाय तिला
ठेवा
कारण चिरंतन टिकणाऱ्या अभेद्य
कुंपणाचा शोध अजून तुम्हाला
लागायचा आहे.
म्हणूनच विश्वाच्या शास्तेपणाचे
कोणाचेही स्वप्न
चिरायू झालेले नाही.
कदाचित म्हणूनच दारोदारी समृद्धी
पेरण्याची संधी
तुम्हाला हाक देऊ शकणार
आहे.

ती हाक ऐकू येईल
त्या अंतिम स्थानापर्यंत
अश्रूसह तुम्ही निश्चयाने जा.
निकराने जा.
कारण, निकराने पुढे जाणारा
एकदा चक्रव्यूहात शिरल्यानंतर
केवळ रिकामा परतल्याचा
इतिहास नाही.

अश्रूने आपले दुःख सांगण्यापेक्षा
दुसऱ्यांच्या वेदनांचे निरूपण
तुम्ही आपल्या अश्रूंनी प्रामाणिकपणे करा.
ती तुमची अजिंक्य अस्त्रे होतील !

●

## प्रामाणिकपणा

तिने विचारले
तू गेल्यानंतर, आम्ही तुझ्या विचाराशी कसे प्रामाणिक रहावे?

तेव्हा तो म्हणाला

आपल्याशी देणे घेणे
करणाऱ्यापेक्षा
आपल्याला वागवणाऱ्या समाजाशी आपण प्रामाणिक असावयास
पाहिजे.
वृक्ष प्रकाश देणाऱ्या

सूर्यावर सावली धरीत नाहीत
तर त्यांना तगवून धरणाऱ्या जमिनीवर सावली धरतात

जिवंत झरा न लाभलेल्या विहिरीतील
पाण्याच्या साठ्याप्रमाणे
प्रामाणिकता साठविता येत नाही.
आणि, कोणत्याही मोटेच्या साह्याने
ती उपसून
जीवनाच्या पिकाला देता येत नाही
तर प्रामाणिकतेचे मळे
कृत्रिम उपलब्धीपेक्षा
निसर्गतः फुटणाऱ्या चैत्रपालवीसारखे
बहरतात
म्हणून त्यांचे फुलणेही कोणाला
रोखता येत नाही.
प्रकाशणारा सूर्य मावळला तरी
दुष्टाव्याच्या अंधारातही प्रामाणिकतेचे तारे चमकत असतात
आणि केवळ अकलेचे तारे तोडणाऱ्याचे
हात
कोणत्याही शक्तीयुक्तीने त्यांच्यापर्यंत पोचू शकत नाहीत.

प्रामाणिकतेची साक्ष मागणारा
मूलतः खुजा असतो.
आणि खरोखर
तारेवर कसरत करणाऱ्या डोंबारणीला
स्वर्गाची उंची विचारणाऱ्याला

तुम्ही काय म्हणणार?

आणि शब्दापेक्षा
प्रामाणिकतेचे अंकित
कृतीने बोलतात.
कर्तव्याला प्रामाणिक
पिढ्यांच्या बलिदानाने आणलेली गंगा
जेव्हा वंचितांचा उद्धार नाकारते
तेव्हा तिला पोचवायची कावड
गाढवांना पाजून
प्रामाणिकतेचा नाथ मोकळा होतो.

पाल्हाळाचे वावडे नसले
तरी आवड नसल्यामुळे प्रामाणिकतेची वाट
एकाकी असते
पण, सोबत नाही म्हणून
सागराचा किनारा
लाटेबरोबर कधीही वाहून जात नाही.

●

## विचार

त्यानंतर
तिने विचारले
मला प्रामाणिकांच्या विचाराविषयी
काही सांग !

तेव्हा तो म्हणाला

कधी कधी
विचार आग्रही होतो
तेव्हा त्याची प्रतिज्ञा
अवघ्या वंशाला विनाशाकडे नेणारे
आंधळे दुर्दैव प्रसवायला संधी देते.
आणि शेवटी असहाय्य अबलेची
विटंबना पाहतांना
केवळ खाली मान घालण्याचाच
अधिकार
त्याला उरलेला असतो.
कारण
विचाराच्या पाईकांना
सावरता येतेच असे नाही.
आणि खरोखर
कडाडणाऱ्या विजेला धरून
कोण सावरू शकेल?
म्हणून तर भुकेच्या कणवेने ते
गिलोटीनशी लगट करून जातात
पुष्कळांना हे माहीत नसते की
चरख्याचे मूल्य सांगणाऱ्या नाण्याची
ती दुसरी बाजू आहे.

आकाशाच्या प्रशांत निळाईप्रमाणे
विचाराला वादळाच्या विरोधाची

भीती वाटत नसते.
म्हणून अविचल सॉक्रेटीसच्या
विषातून ते
अमरत्वाचे अमृत पितात
आणि इंद्रायणीत बुडणाऱ्या
वाण्याची वाणी होऊन
ते तरतात-
तेव्हा आपल्यावर कोपणाऱ्यापेक्षा, आपला अबोला
आकाशाशी आहे
याची त्यांना जाण असते.

विचाराच्या दृढतेला अनुयायी आणि
सहकारी लागतातच असे नाही.
रावणाच्या लंकेत ते
एकटे दुकटे विभीषण होऊन राहतात
आणि रक्तापेक्षा
वनवाश्यांच्या अश्रूंशी नाते जोडून
धन्य होतात.
सर्वांच्या समान सुखाची स्वप्ने
उगवणारी दिशा जिंकण्यासाठी
आजपर्यंत धडपडत आलेल्या
विचाराच्या जन्माला स्थळ आणि काळाची
विशिष्टता लागत नसते.
कधी कधी
कारागृहाच्या गजाआड
सात दुर्दैवं प्रसवलेल्या देवकीपोटी

आठव्या वेळी तो जन्माला येतो.
स्वतःपेक्षा
इतरांच्या दुःखाची जाणीव ज्याला असते
आणि अवघी चारच दुःखे पाहिल्याबरोबर
मानवमात्राला त्यातून मुक्त करण्यासाठी
अर्ध्या रात्री सर्वस्व टाकून निघण्याचे
धाडस जो करतो
तो एक विचार होऊन
कल्याणाच्या गयेला बरोबर पोचतो.

•

## धर्म

त्यानंतर, तिने विचारले
मला धर्माविषयी काही सांग !

तेव्हा तो म्हणाला,

खरोखर
वाटा नसत्या तर
कोण मुक्कामाला पोचू शकला असता?

आपल्याला घराकडे नेणारा रस्ता
निबिडलेला असावा
असे कोणाला वाटेल?
तरी पण,
कळपाला कंटाळणारी
काही चुकार जनावरं

नेहमीच पळवाटा काढत असतात.
आणि हाताने नसल्या तरी
आपल्याच पायांनी आपल्या वाटा
खडतर करून घेत असतात.
त्यांना वाटत आले असावे
की; आपण धरू ती वाट
आपल्या गोठ्याकडे जाणारी असेल.
पण रस्ता कधीही
कोणा एकाच्या घराकडे जात नाही.
तो सगळ्यांच्या घरावरून जात
असतो !

जन्मदत्त देणगी किंवा
परंपरेचा वारसा मिरवणारे
धर्माच्या वाटांची मक्तेदारी मिळवतात
आणि वाटाड्यांचे सोंग आणून
पांथस्थांना लुबाडतात.
शेवटी
धर्मबुडीच्या नावाने
उलट्या बोंबा ठोकतांना
त्यांना कळत नाही
की, सुबक असली तरी
वाटमारी होणारी वाट कोणी धरत नाही.

वाकवता न आलेला बाणा
परत परत मोडता आला तरी

चितोडच्या चितेत
राख झालेला धर्म
जिंकल्या गेल्याचा
तारीखनामा लिहील्या गेला नाही.
आणि
हे विसरून
चालत्यांना वाट चुकवण्याचे प्रयोग
करणारे
जेव्हा पूर्वजांचे आग्रही अंधानुकरण करू लागतात
तेंव्हा
डोंगरी उंदीर समजल्या जाणाऱ्या
एखाद्याला
माती ऐवजी मिठाईतून सापडते
ती वाट धर्माचीच असते !
धर्म हा माणसासाठी आहे.
म्हणून
धर्मासाठी माणूस नागवला डुबवला
उपेक्षिला जाऊ नये.
रंगांना कधीही वाटू नये
की, भिंती आपल्याला लावलेल्या
आहेत...

काही लोक
दुर्बल आणि असहाय्य झाल्यानंतर
धर्माची कास
धरतात

पण निर्वाणीच्या वेळी
धर्माच्या नावाने
वेळकाढूपणाचा डाव टाकणारे
जमिनीत रुतलेल्या
रथाच्या चाकाबरोबर
गाडले जातात
आणि खरोखर
उन्मळतांना
प्रकाशकिरणांचा आधार घेतल्याने
वृक्ष सावरू शकेल काय ?

●

## प्रेम

त्यानंतर ती म्हणाली
मला प्रेमाविषयी
काही सांग !

तेव्हा तो म्हणाला

खरोखर
जे हृदयाला समुद्र मानतात
ते धन्य होत
पण, आकाशाला गवसणी घालता येणारे
हात
असले तरी
सागराला

मर्यादा तुडवता येणारे पाय
नसतात !
पण, केवळ त्याचसाठी कुढत बसणाऱ्यांना
तुम्ही काय म्हणणार ?
कारण, पांगळा असलेल्या अरुणालाच
जगातल्या सर्वोत्तम गतीचे ज्ञान
नसते काय ?

प्रेमाची नेमकी व्याख्या सांगता आलेली
नाही,
आणि खरोखर
मुक्यांना पडणाऱ्या स्वप्नांविषयी
नेमके
कसे सांगता येईल ?

पृथ्वी आणि आकाश
यांच्या संयोगाइतके अनादि
व चंद्र आणि सूर्याच्या पाठलागाइतके नित्य
एव्हढे प्रेमाचे आयुर्मान आहे
पण म्हणून काही
प्रेम
वाऱ्यातून खेळतांना
किंवा आभाळातून गळतांना
सहज आढळणार नाही.
तर त्याचे दर्शन
अवचित उगवणाऱ्या धूमकेतूइतके

अनिश्चित असेल.

प्रेमाकडून फक्त प्रेमच मागा
कारण
इंद्रधनुष्य आवडले म्हणून
त्याचे रंग काढण्यासाठी
शिडी लावू पाहणारे
कोसळणार नाहीत काय ?

आणि, तुम्ही प्रेमावर हक्क सांगू नका
कारण
स्वच्छ व शांत
जलाशयात पडलेल्या चंद्रबिंबावर
आपापला हक्क सांगीत
रात्रभर भांडत बसलेल्या दोन्ही वेड्यांच्या हाती
शेवटी काय पडेल?

आणि प्रेमाच्या अंतिम प्राप्तीमुळे
सर्व दुःखे संपतील
असे मानणाऱ्याला
काय म्हणावे?
कारण
सूर्य आणि चंद्र
एका जागी आणल्यानंतर
उरलेल्या रात्री
अधिक भयाण होणार नाहीत
काय ?

पंखाच्या केवळ आकारावरून
उड्डाणाच्या उंचीचा अंदाज लावायचा
नसतो.
प्रेमाची
श्रेष्ठ वा कनिष्ठ
अशी श्रेणीही
कोणी लावू नका.
कारण;
पृथ्वीवरून पाहणाऱ्याला
चंद्र वर दिसत असला तरी
चंद्रावरून पाहणाऱ्याला
पृथ्वी वर दिसत असते.

प्रेमाने साहिलेले
कधी कधी
नियतीने पाहिलेलेही नसते
म्हणून;
प्रेमाच्या परिणामाची जबाबदारी
नियतीवर जात नाही
कारण भर समुद्रात बुडणाऱ्याला
एकवेळ तारता येईल
पण, केवळ मृगजळात बुडणाऱ्याला
तारण्याचा प्रयत्नही
कोणाला करता येत नाही !

●

## मौन

त्यानंतर ती म्हणाली
मला मौनाविषयी
काही सांग !
तेव्हा तो म्हणाला
ओठाने बोलणे थांबविले तरी
तुम्ही
आपल्या हृदयाची भाषा गमावू नका.
नाही तर
तुमची अवस्था
रंगाबरोबरच
सुगंधही गमावलेल्या
निर्माल्यावत्
होणार नाही काय ?
आणि
हृदयाची भाषा शब्दातीत असते
म्हणून तर कोणीही
बोलता न येणाऱ्या
बालकांना
मुके म्हणत नाही !
मौनच पाळायचे असेल तर
तुम्ही
सूर्यप्रकाशाइतके स्वच्छ व्हा !
म्हणजे तुमच्या हेतूशी निगडित
असणाऱ्यांना

तुमच्यामध्ये वावरतांना
भीती वाटणार नाही.
एखाद्याने
बोलून केलेल्या अन्यायाचा निषेध
म्हणून
निवाडा देणाऱ्या
न्यायाधीशाने मौन पाळले तर
न्यायाचे काय होईल ?
वीज कडाडते म्हणून कोसळते
असं नव्हे.
तर;
गप्प राहणाऱ्या ताऱ्यांच्या दैवी देखील
कोसळणे असत नाही काय ?
आणि खरोखर
डरकाळणाऱ्या सिंहिणीइतकाच
मुक्या नागिणीचा विळखाही
जीवघेणा नसतो काय ?
मौनाच्या महतीने
गुंजारव थांबविले तर
कळ्यांना फुलण्याचा
खरा आनंद कसा मिळू शकेल ?
आणि खरोखर
सर्वार्थाचे साधन समजून
आईने मौन पाळले तर
अवघी बालके

मुकी होणार नाहीत काय ?

कधी कधी
प्रकाशाचा द्वेष करणारे
पाखरांना मुके करतात
पण त्यामुळे
सूर्य उगवायचा थांबत नाही
त्यांना हे कळत नाही की,
पाखरांच्या किलबिलाटाने
सूर्य उगवत नसतो
तर सूर्योदयाला शोभा येत असते !
अट्टाहासाने
मुके करण्याचे प्रयोग करणारे
महाभाग
जेव्हा एखाद्याला सुळावर देतात
तेव्हा जाता जाता
पृथ्वीवरचा तो प्रेषित
आकाशाचा बाप होऊन
आपली वाचा
आपला बळी घेणाऱ्या सुळालाच
देवून जातो.

आणि
पापाचे कितीही रांजण भरले असले
तरी

क्रौंच पक्ष्याची
आर्त व्याकूळता पाहून ज्याला
अनुष्टुभ् सुचतो
तो मौन कसा राहू शकेल ?

●

## दैव

त्यानंतर ती म्हणाली
मला
दैवाविषयी काही सांग !

तेव्हा तो म्हणाला

खरोखर
इच्छा, आकांक्षा, प्रयत्न आणि अपघात
याचेच
ते आणखी एक नाव नाही काय ?
म्हणून तर दैव देता येत नसले तरी
घडवता येत असते !

पुष्कळ वेळा
दैवाने अडवणूक केली म्हणून
काही लोकांनी हात टेकलेले
दिसून येते.
पण, डोंगर आडवे आले म्हणून
वाऱ्याने थांबून कसे चालेल?

आणि वाहणे ज्यांचा जीवनधर्म आहे
ते पाझर
खडक फोडून बाहेर पडत
नाहीत काय ?

दैवाशी दोन हात करण्यापेक्षा
यशापयशाचे आडाखे बांधीत
अंग चोरणाऱ्याला काय म्हणावे ?
कारण,
जिंकता येणार नसले तरी
युद्ध लढण्यात
पुरुषार्थ नसतो काय ?
भावुकतेने
त्याची वाट पाहणाऱ्याकडे
तो जाईलच असे
नाही.
पण म्हणून तुम्ही त्याला कठोर
समजू नका.
आणि खरोखर
आपल्याकडे न येऊ शकलेला प्रियकर
आपल्याला विसरला
असे तुम्हाला म्हणता येईल काय ?

खवळणाऱ्या सागराप्रमाणे
दैव देखील कोपणारे असते
हे खरे असले तरी;

ते आव्हान स्वीकारून
समुद्रगर्भात शिरणारेच
रत्ने मिळवितात.
पण
केवळ भीतीने वाळूत फिरत राहणाऱ्याला
शंखाशिवाय काय सापडेल ?

काही लोक
गृहगणिताने
दैवाच्या दशेची दिशा
शोधू पाहतात,
पण त्यांचा शोध
हत्ती पाहणाऱ्या आंधळ्यासारखा नसतो
काय ?

आणि
दैव कधीही दुबळे होत नसते
ढगाच्या गडद छायेने
कितीही निस्तेज वाटत असला तरी
सूर्य कधीही दुबळा झालेला नसतो !

भिंतीवरच्या आरशात पडलेल्या
आपल्या कपाळाच्या प्रतिबिंबात
तुम्हाला दैव वाचता येणार नाही.
तर;
तळहातावर घेऊन त्याला तुम्ही

आकार देऊ शकाल.
म्हणून तर
दैव हातात असते असे
शहाणे लोक सांगतात.

आणि पारंपारिक संपन्नता म्हणजे
सुदैव
असे तुम्ही मानू नका.
कारण
वारसाहक्काने मिळालेले
घोड्याचे एखादे शिल्प
कितीही सुंदर आणि हुबेहूब
असले तरी
तुम्हाला त्याचा उपयोग
युद्धे जिंकण्यासाठी
होईल काय ?

●

## शिक्षण

त्यानंतर ती म्हणाली
मला शिक्षणाविषयी
काही सांग !

तेव्हा तो म्हणाला

तुम्ही
एखाद्यावर शिक्षण लादू नका

तर स्वतःच्या आवडीने
त्याला ते घेऊ द्या
कारण
शिकवल्याने वाऱ्याची दिशा
ठरत नसते
तर तो नेहमीच
आपल्या कलाने वाहत असतो !

शिक्षण
जीवनाच्या मंदिराचा पाया आहे
कळस नव्हे!
आणि पुष्कळ वेळा
पाया मजबूत करण्यासाठी त्यात
दगडच भरले जातात
चाकोरीतील शिक्षण
तुमचे जीवन कदाचित संपन्न
करू शकेल
पण जीवनातील सौंदर्य शोधण्यासाठी
तुम्हाला
स्वतःकडेच जावे लागेल
समुद्राची वाफ घेवून निघालेले ढग
संपन्नतेसाठी पृथ्वीवर बरसतात
पण स्वतःचे सौंदर्य शोधण्यासाठी
त्यांना परत
सागराकडे जावे लागते.

शाळेच्या भिंतीआड
गुरुजींनी दिलेले धडे
आयुष्यभर कोणीही गिरवीत नाही
आणि खरोखर
मुक्त झाल्यानंतरही
पोपट
पिंजऱ्याने शिकवलेली भाषा बोलत
राहील काय ?

आणि तुम्हाला माहीतच आहे की,
एखाद्याला
चक्रव्यूहात शिरावयाचे शिक्षण
गर्भाशयात देता येत असले तरी
त्यातून बाहेर पडावयाचे मार्ग
मैदानाअभावी
सांगता येत नसतात

तुमच्या शिकवण्याचा हेतू
उदात्त असेल तर
तुम्ही प्रत्येकाला
स्वतःला शिकवण्याविषयी सांगा.
आणि पहा
स्वतःहून शिकलेला सूर्य
उगवतांना
कधीही चुकत नसतो !

●

## भाषा प्रकाशनाची आजवर प्रकाशित पुस्तके

**पावरा समाज व संस्कृती** (मराठी), प्रा. डी. जी पाटील, पृ.३०, रु. ७५/-

**तेजगडनां गीतो** (राठवी व तडवी), श्रीमती मनीषा वरीया-श्री नगीन राठवा, पृ.५१, रु.१५/-

**झम्म झांझरियुं रे** (गुजराती व तडवी), श्रीमती रेवाबेन तडवी, पृ.४६, रु.१५/-

**तेलावने मेळे** (राठवी), श्री शंकरभाई तडवी, पृ.६९, रु.४५/-

**हातपुडान सानिध्यमाय आदिवासी पावरा संस्कृती** (पावरी), श्री सुभाष पावरा, पृ.१२१, रु.५०/-

**आदिवासी कम्युनिटीज् ॲन्ड लँग्वेजिस् ऑफ इन्डिया** (इंग्रजी), कु. नीमा गढीया, पृ.८२, रु.६०/-

**आदिम तालनं संगीत** (अहिराणी), डॉ. सुधीर देवरे, पृ.११२, रु.५०/-

**अज्ञानकोश अर्थात नसाबनीती** (मराठी), श्री आत्माराम राठोड, पृ.७८, रु.५०/-

**द अओ नागा ओरल ट्रेडिशन** (इंग्रजी), प्रो. तेमसुला अओ, पृ.१९५, रु.१२५/-

**भील गीतवार्ता : ढोला मारुणी** (भिली-गुजराती), डॉ. भगवानदास पटेल, पृ.६५ रु.४०/-

**आदिवासी जाणे छे !** (गुजराती), डॉ. गणेश देवी, पृ.११६, रु.१००/-

**भील भजनवार्ता : हपियादे होखली** (भिली-गुजराती), डॉ. भगवानदास पटेल, पृ.६५, रु.४०/-




**मंडोळ (गुजराती)**, प्रो. सुरमल वहोनिया, पृ.८०, रु.९०/-

**वारसो** (भिली-गुजराती), श्री अर्जुनसिंह पारगी, पृ.१०१, रु.१२५

**बगडावत देवनारायण और गुजरांनो अरेलो का तुलनात्मक अध्ययन** (हिंदी), डॉ. जिज्ञासा पटेल, पृ.५८, रु.४०

यांशिवाय निरनिरळ्या आदिवासी भाषांमध्ये तसेच मराठी व गुजराती प्रमाण भाषांमध्ये आदिवासीचे नियतकालिक 'ढोल' निघत असते, जे भाषा प्रकाशनाकडून प्रकाशित करण्यात येते.

अधिक माहितीसाठी संपर्क

# भाषा प्रकाशन

## आदिवासी व उपेक्षितांच्या कामी समर्पित प्रकाशन

६, युनायटेड ॲव्हेन्यू, दिनेश मिल-उर्मी रोड, वडोदरा ३९०००७
फोन नं. ०२६५-२३३११३०, ई मेल : brpc_baroda@sify.com




